राजापूर ता. शिरोळ जि. कोल्हापूर को.प. बंधारा विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०१६/ ७०९ / १६ /सिं.व्य.(कामे)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- १५/०७/२०१७

वाचा :-

संदर्भ १) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र. मकृखोविम/०२/ (५९७/२०१६) /प्रशा-४/२६०८/२०१७, दि.२९/०६/२०१७.

२) शासन निर्णय संकीर्ण २०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६.०५.२०१७.

प्रस्तावना

राजापूर को.प. बंधारा हा कृष्णा नदीवरील महाराष्ट्र कर्नाटक सीमेवरील शेवटचा बंधारा आहे. हा बंधारा दगडी बांधकामात असून बंधाऱ्याचे काम सन १९८० साली पूर्ण करण्यात आले आहे. बंधाऱ्यास एकूण ६५ दगडी स्तंभ असून त्यांची उंची ४.५ मीटर इतकी आहे. सदर बंधाऱ्यात पाणी अडवून उपसा सिंचनाव्दारे कृष्णा नदीचे दोन्ही तीरावरील सरासरी १२२५० हेक्टर क्षेत्र सिंचीत केले जाते. तसेच नदी काठावरील दोन्ही तीरावरील २३ ग्रामंपचायती, २ नगरपालिका व १ साखर कारखान्याकरीता पिण्यासाठी व औद्योगिक कारणासाठी पाणी पुरविले जाते. या करीता कोयना / वारणा धरणातून आवश्यकते नुसार पाणी सोडून घेऊन पुरविले जाते.

कृष्णा नदीच्या महापूरामुळे व कर्नाटक राज्यातील हिप्परगी बॅरेजच्या बॅक वॉटर मुळे बंधारा बऱ्याच कालावधीसाठी पाण्याखाली असतो. बंधाऱ्याच्या दगडी बांधकामास हानी होवून स्तंभाच्या दगडी खाचा व सिल मधून पाण्याची गळती होते. बंधाऱ्याच्या स्लॅबचे सुध्दा नुकसान झाले आहे. त्यामुळे बंधारा परिचलनात अडचणी येऊन बंधाऱ्याच्या स्थैर्यास धोका निर्माण झाला आहे. सदरचा बंधारा हा कृष्णा नदीवरील शेवटचा बंधारा असून हा बंधारा ना दुरुस्त असल्याने पूर्ण क्षमतेने पाणी साठा करता येत नसल्याने सिंचन व बिगर सिंचनासाठी पाणी पुरवठा करणे अडचणीचे होत आहे. त्यामुळे या बंधाऱ्याची दुरुस्ती करणे अत्यावश्यक आहे. मा. आमदार वि. स. स. शिरोळ यांनी मा. राज्य मंत्री, जलसंपदा विभाग यांचेकडे या बंधाऱ्याची दुरुस्ती करण्यासाठी पत्राव्दारे मागणी केली आहे.

१३ व्या वित्त आयोगातंर्गत या बंधाऱ्याचे गाळा क्र. १ ते २२ मधील दुरुस्तीचे काम अंतिम टप्प्यात आहे. या अंदाजपत्रकामध्ये बंधारा गाळा क्र. २३ ते ६५ मधील स्तंभ, सिलची दुरुस्ती बंधाऱ्याच्या डाव्या बाजूकडील खालील बाजूच्या विंगवॉलची दुरुस्ती व अनुषंगिक बाब कामाचा समावेश करण्यात आला आहे.

प्रस्तावीत कामामुळे संपूर्ण बंधारा पुनश्च: १०० टक्के कार्यक्षमतेने कार्यान्वित करता येणार आहे. तसेच ही कामे सत्वर पूर्ण न केल्यास सध्या दुरुस्ती काम पूर्णत्वाचे स्थितीत असलेल्या बंधाऱ्याच्या भागासही धोका पोहोचून एकूण बंधाऱ्याची स्थैर्यता धोक्यात येण्याची शक्यता आहे.

त्यायोगे बंधाऱ्याच्या स्थैर्यास धोका पोहोचल्यास सिंचन व बिगरसिंचनासाठी पाणी पुरवठा करणे अशक्य होईल. हा बंधारा कर्नाटक व महाराष्ट्र सीमेवरील शेवटचा बंधारा असून टंचाई काळात कर्नाटक शासनाच्या मागणीनुसार या बंधाऱ्यातूनच पाणी सोडण्यात येते व त्यामूळे महसूलात वाढ होते. सर्वसाधारणपणे कर्नाटक राज्यासाठी सोडण्यात येणाऱ्या पाण्यापोटी रु. ५ ते ६ कोटी व महाराष्ट्र राज्यातील सिंचन व बिगरसिंचनापोटी सुमारे रु.२ कोटी प्रतिवर्षी महसूल गोळा होतो. तो बुडण्याची शक्यता आहे. बंधाऱ्याच्या स्थैर्यास धोका निर्माण झालेने या बंधाऱ्याचे विशेष दुरुस्तीचे काम करणे आवश्यक आहे.याअनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर दुरूस्तीच्या कामाकरीता विशेष दुरूस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

या शासन निर्णयाव्दारे को. प. बंधारा राजापूर ता. शिरोळ जि. कोल्हापूर विशेष दुरूस्तीच्या कामांसाठी विशेष दुरूस्ती अंतर्गत संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये प्रस्तावित कामांच्या रु. **४,७०,४८,४८८/-** (रु.चार कोटी सत्तर लाख अठ्ठेचाळीस हजार चारशे अठ्ठयांशी फक्त) खर्चाच्या अंदाजपत्रकास **(अनुषंगिक खर्च रु. ४२,७७,१३५/-)** खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३ /(७८५/१३)/ सिं.व्य. (कामे), दि.०१/०१/२०१५ मधील मागदर्शक सुचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

२) सदर प्रकल्पाचे काम प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या अधीन राहून व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावे.

३) प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ लागू करावा व पाणी वापर संस्था स्थापन करुन त्यांच्याकडे लाभक्षेत्र हस्तांतरीत करण्यात यावे.

४) कालवा स्वच्छता व माती भरावाची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून प्राप्त करून घ्यावे.

५) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने व दरसूचीबाह्य बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

६) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

७) मा. राज्यपाल यांच्या वित्तीय निर्बंधानुसार महामंडळाच्या वार्षिक अर्थसंकल्पात एकूण तरतूदीच्या २ % च्या आत विशेष दुरुस्ती/विस्तार व सुधारणा लेखाशीर्ष अंतर्गत वाढ विस्तार आणि सुधारणा (ERM) अंतर्गत कामे घेण्यात यावी.

८) काम भौतिक व आर्थिक दृष्ट्या पूर्ण झाल्या नंतर त्याचे पूर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र ( Completion Report & Certificate ) शासनास सादर करावे.

या कामावर होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, १९०, सार्वजनिक व इतर उपक्रमातील गुंतवणूका (१०) उर्वरीत महाराष्ट्र (१०) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान ( विस्तार व सुधारणा ) ( उर्वरित महाराष्ट्र ) (४७०२ ७४५२ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या खाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे), कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २३ सन २०१७-१८मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१५१७११५२४९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.07.15 17:11:07 +05'30'

**(न.गौ .बसेर)**
**शासनाच्या अवर सचिव**

**सोबत :- परिशिष्ट-अ**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा. सभापती/उपसभापती, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन मुंबई
७) मा. मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सचिव, (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) महालेखापाल -१ ( लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) महालेखापाल -२ ( लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२) कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१३) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
१६) कार्यकारी अभियंता, सांगली पाटबंधारे विभाग, सांगली
१७) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्र.प्रमाप्र-२०१६/(प्र.क्र.७०९/२०१६)/सिं.व्य.(कामे), दि.१५/०७/२०१७ चे सहपत्र.**

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | कामांचा तपशिल | प्र. मा. रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | खोदकाम | १,६०,६२३ |
| २ | काँक्रीट | १,८४,२२,०७८ |
| ३ | मातीकाम | १,७८,०६,३१६ |
| ४ | शॉटक्रीट | १८,४०,३७० |
| ५ | दगडी अश्मपटल | २,४१,६९५ |
| ६ | बर्गे | ३९,६३,००० |
| ७ | लोखंडी कमान | ५०,४१४ |
| ८ | गुण नियंत्रण चाचण्या | २,८६,८६० |
| १० | **एकूण बांधकामाधिन खर्च** | **४,२७,७१,३५६** |
| | १० टक्के अनुषंगिक खर्च | ४२,७७,१३५ |
| | **एकूण** | **४,७०,४८,४८८** |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.07.15 17:11:18 +05'30'

**( न.गौ.बसेर)**
**शासनाच्या अवर सचिव**